ई-डिस्ट्रीक्ट प्रकल्पांतर्गत शासनाकडून नागरिकांना पुरविण्यात येणा-या सेवांकरिता प्रमाणित करण्यात आलेल्या फॉर्म्सचे नमुने अन्य जिल्हयात वापरण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शासन निर्णय क्रमांक : मातंसं ११०५/प्र.क्र.१२३/३९**
**सामान्य प्रशासन विभाग**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२**
**दिनांक: १३ मे २०११**

**वाचा:** शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण -११/२०१०/प्र.क्र.८३/ई-१, दिनांक - २१ फेब्रुवारी २०११

ई-डिस्ट्रीक्ट हा राष्ट्रीय ई-गव्हर्नन्स योजनेंतर्गत भारत सरकारकडून राबविण्यात येणारा अभियानवत (Mission Mode) प्रकल्प आहे. हा प्रकल्प सामुहिक सेवा केंद्र (C.S.C.) / महा ई-सेवा केंद्र यांच्या माध्यमातून राबविण्यात येत आहे. हा प्रकल्प शासनाकडून नागरिकांना पुरविण्यात येणा-या सेवा देण्यासाठी सहाय्यभूत आहे.

२. सद्यस्थितीत ई-डिस्ट्रीक्ट प्रकल्प पुणे, नागपूर, लातुर, नांदेड आणि सिंधुदुर्ग या ५ जिल्हयांमध्ये पथदर्शी तत्वावर राबविण्यात येणार आहे. ई-डिस्ट्रीक्ट प्रकल्पांतर्गत खालील १० प्रकारच्या सेवा देण्यात येणार आहेत.

१) उत्पन्नाचा दाखला
२) तात्पुरता रहिवास / रहिवासाचा दाखला
३) वय, राष्ट्रीयत्व आणि अधिवासाचा दाखला
४) ऐपतीचा दाखला
५) जेष्ठ नागरिक दाखला
६) जन्म नोंदणीचा दाखला
७) मृत्यू नोंदणीचा दाखला
८) निवडणुकीशी निगडित सेवा - मतदार यादीत नांव घालणे
९) निवडणुकीशी निगडित सेवा - मतदार यादीत नांव काढणे
१०) माहितीच्या अधिकार अधिनियमाशी निगडित सेवा

३. ई-डिस्ट्रीक्ट प्रकल्पाच्या माध्यमातून पुरविण्यात येणा-या १० सेवांकरिता लागणा-या फॉर्म्सचे नमुने सन २०१० मध्ये प्रमाणित करण्यात आले आहेत हे नमुने वर नमुद केलेल्या १० प्रकारच्या सेवा देण्यासाठी महाराष्ट्रात अन्य जिल्हयात वापरण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०११०५१८१५४६१३००९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.

( डॉ.संतोष भोगले )
अवर सचिव (मातं)
महाराष्ट्र शासन

प्रति,
सर्व विधान सभा/ विधान परिषद सदस्य
मा. राज्यपाल याचे सचिव
अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी
सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
निवड नस्ती